**राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे या कार्यालयाकरिता नवीन झेरॉक्स मशीन खरेदी करण्यासाठी प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- संकिर्ण- ०९२१/ प्र.क्र.११०/१३स,**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- ३१ मे, २०२३.

<u>वाचा:-</u> १. राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे क्रं.रासनिप्रा / माहिती तंत्रज्ञान / झेरॉक्स मशिन/ खरेदी/ GEM/ २७२७/ २०२१, दिनांक १३.०९.२०२१ रोजीचे पत्र.
२. राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे क्रं.रासनिप्रा/ माहिती तंत्रज्ञान / झेरॉक्स मशिन खरेदी/ निधी माहिती/ ३९३४/२०२१, दिनांक १७.११.२०२१ रोजीचे पत्र.
३. राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे क्रं. रासनिप्रा/ महिती तंत्रज्ञान/ झेरॉक्स मशिन खरेदी/ माहिती/ १९७४/ २०२२, दिनांक ०९.०३.२०२२ रोजीचे पत्र.
४. राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे क्रं.रासनिप्रा/ माहिती तंत्रज्ञान/ झेरॉक्स मशिन खरेदी/ माहिती / ८४७९/ २०२२, दिनांक २१.११.२०२२ रोजीचे पत्र.

**<u>प्रस्तावना :-</u>**

महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम, १९६० (१९६१ चा महा.चोवीस) (सन २०१३ चा महाराष्ट्र अध्यादेश क्रमांक २ अन्वये सुधारीत केल्यानुसार) च्या कलम ७३गख याद्वारे प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करून दिनांक ३० मार्च,२०१३ रोजीच्या अधिसूचनेप्रमाणे राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे घटित करण्यात आले. सदर कार्यालयामार्फत राज्यातील सहकारी संस्थांच्या निवडणूका घेण्याचे कामकाज पार पाडले जाते. निवडणूका घेताना पात्र सभासदांची यादी तयार करणे, निवडणूक कार्यक्रम घोषित करणे, प्रत्यक्ष मतदान घेणे, निवडणुकी दरम्यान आचारसंहितेचे पालन केले जाते किंवा नाही हे तपासणे, निवडणुका सुरळीत, शांतता पुर्ण व भयमुक्त वातावरणात पार पाडण्याची जबाबदारी प्राधिकरणावर सोपविण्यात आली आहे. राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण कार्यालयात उपलब्ध असलेली झेरॉक्स मशीन ही सन २०१५ मध्ये खरेदी करण्यात आलेली असून सद्यस्थितीत वारंवार दुरूस्त करावी लागत असल्याची बाब प्राधिकरणाने शासनाच्या निदर्शनास आणली आहे. सहकारी संस्थांच्या निवडणूकीचे कामकाज सुरळीत होण्यासाठी राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे या कार्यालयासाठी नवीन झेरॉक्स मशीन खरेदी करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे या कार्यालयाकरिता, कार्यालयीन कामकाजासाठी एक नवीन झेरॉक्स मशीन खरेदी करण्यास अंदाजित रक्कम रुपये ४,६३,८००/- (अक्षरी रुपये चार लक्ष त्रेसष्ट हजार आठशे फक्त) इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास खालील अटी / शर्तींच्या अधीन राहून **प्रशासकीय मान्यता** देण्यात येत आहे.

१. उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या दिनांक ०१.१२.२०१६ रोजीच्या शासन निर्णयात नमूद केलेल्या तरतुदींच्या अनुषंगाने तसेच, दिनांक २४.०८.२०१७ व दिनांक ०८.१२.२०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये केंद्र शासनाने विकसीत केलेल्या गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस या पोर्टलची कार्यपद्धती वस्तू व सेवा खरेदीसाठी स्विकृत करण्याबाबत मार्गदर्शक सुचना देण्यात आल्या आहेत. त्यानुसार गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस वरून खरेदी प्रक्रिया राबविण्यात यावी.
२. झेरॉक्स मशीनची खरेदी ही वस्तूचा दर्जा, विर्निदेश, उत्कृष्ट वस्तूंचा पुरवठा व वाजवी किंमत या बाबी विचारात घेऊन गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस वेब पोर्टलवरील एल-१ पुरवठादाराकडून करावी.
३. नवीन झेरॉक्स मशीन खरेदी करतेवेळेस खुल्या बाजारातील किंमती व गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस वेब पोर्टलवरील किंमतीची तफावत तसेच वस्तूचा दर्जा, विनिर्देश, उत्कृष्ट वस्तूंचा पुरवठा, वाजवी किंमत व संपूर्ण खरेदी प्रक्रियेमध्ये पारदर्शकता या बाबींचा तुलनात्मक अभ्यास करून गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस वेब पोर्टलवरून खरेदी करावी.
४. विचाराधीन असलेल्या झेरॉक्स मशीन खरेदीसाठी प्रस्तावित अंदाजित रक्कम योग्य आहे किंवा नाही, याची खातरजमा करून, खरेदीबाबतची कार्यवाही करावी.
५. नवीन झेरॉक्स मशीन खरेदी केल्यानंतर राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी, सदर कार्यालयात सन २०१५ मध्ये खरेदी करण्यात आलेली वारंवार दुरूस्ती करावी लागणारी झेरॉक्स मशीन ३ महिन्यांत विहित शासकीय कार्यपद्धतीनुसार निर्लेखित करण्यात यावी.
६. सदर निधी ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आला आहे, त्याच प्रयोजनासाठी व मंजूर निधीच्या मर्यादेत खर्च करण्यात यावा. केलेल्या खर्चाचा तपशील व उपयोगिता प्रमाणपत्र विहित मुदतीत शासनास आणि महालेखापाल कार्यालयास सादर करण्याची आणि महालेखापालांच्या लेख्याशी खर्चाचा ताळमेळ घालण्याची जबाबदारी राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे या कार्यालयाची राहिल.
७. या कारणास्तव होणारा खर्च मागणी क्र. व्ही-२ , मुख्यशीर्ष २०७०, इतर प्रशासनिक सेवा, ००,८००, इतर खर्च, (००)(०१) राज्य सहकारी निवडणूक (२०७० ०८८२) प्राधिकरण (अनिवार्य) (१३) कार्यालयीन खर्च या उद्दीष्टाखाली करण्यात येईल.
८. सन २०२३-२०२४ या आर्थिक वर्षात "१३ कार्यालयीन खर्च" या उद्दीष्टाखाली वितरीत करण्यात आलेल्या रकमेच्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी सादर करणे बंधनकारक राहिल.
९. या शासन निर्णयान्वये सहाय्यक निबंधक (अंदाज व नियोजन) सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून व सह सहकारी

निवडणुक आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

**०२.** हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक: विअप्र- २०१३/ प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल,२०१५ अन्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग-१, उप विभाग-२ मधील अ.क्र.२६ (अ) अन्वये महाराष्ट्र आकस्मिक खर्च नियम १९६५ च्या नियम क्र.७६ च्या संदर्भात प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

**०३.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०६०११५५७३०९९०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ANIL JAYRAM CHAUDHRY

Digitally signed by ANIL JAYRAM CHAUDHRY
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=f26cf80358fa3133e4d85ddac30ae54b06c63743fd5510dc0ebca082b6c483ce, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D124AE9BBD15BED87DBD08EF779CF1B85A4020339EB1C2EF0E112FB67063011C, cn=ANIL JAYRAM CHAUDHRY
Date: 2023.06.01 15:58:22 +05'30'

**( अनिल ज. चौधरी )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. सचिव, राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य-१ / २ , मुंबई/ नागपूर.
४. महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य-१/२, मुंबई/ नागपूर.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई/ निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
६. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
७. उप सचिव (व्यय-२) व (अर्थ-१३), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. अवर सचिव (१७स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. कार्यासन अधिकारी (रोख शाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.

**प्रत,**

१. मा.अपर मुख्य सचिव (सहकार व पणन), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक.
२. निवडनस्ती कार्यासन १३-स.